# सिमन बोलिव्हर

जॅन, कॅथलीन; चित्र: टॉम; मराठी: सुशील मेन्सन





# सिमन बोलिव्हर

जॅन, कॅथलीन; चित्र: टॉम

सिमन बोलिव्हरचा जन्म 1783 साली एका अशा देशात झाला, जिथे श्रीमंत लोक अत्यंत धनवान होते तर गरीब लोक अत्यंत हलाखीत जगत होते.



सिमन बोलिव्हरचे कुटुंबही धनिक होते. व्हेनेझुएला देशातील इतर श्रीमंत लोकांसारखेच त्याच्या कुटुंबाचेही मूळ स्पॅनिश होते.



सिमन नऊ वर्षांचा असताना त्याच्या आईवडिलांचा मृत्यू झाला. सिमनच्या काकांनी त्याला शिकवण्याकरिता अनेक शिक्षक नेमले. पण सिमनला शिकवणे मोठे अवघड काम होते. कोणालाही ते जमले नाही. अखेरीस, सिमन रॉड्रिग्ज हे शिक्षक आल्यानंतर प्रश्न सुटला. दोन्ही सिमनचे एकमेकांशी चांगले जमू लागले.

पुढील सहा वर्षे, सिमन चौदा वर्षांचा होईपर्यंत रॉड्रिग्जने त्याला युरोपातील महान तत्त्वज्ञांच्या विचारांची ओळख करून दिली. या तत्त्वज्ञांमध्ये स्वातंत्र्य आणि समानतेचा पुरस्कार करणारा फ्रेंच तत्त्वज्ञ जिन-जाक रूसोदेखील होता.

रूसो म्हणायचा, “लोक आपल्या मुलांच्या सुरक्षेची खूप काळजी घेतात. पण मुलांना स्वतःचं संरक्षण स्वतःच करण्यासाठी काय शिकवलं पाहिजे, याचा विचार ते कधी करत नाहीत. आईसलँडमधला अतिशीत हिवाळा असो की माल्टातील अतितप्त उन्हाळा! कोणत्याही बिकट परिस्थितीत जिवंत राहाण्याचं कौशल्य आपण मुलांना दिलं पाहिजे.”



हीच गोष्ट रॉड्रिग्जने सिमनला समजावली. रॉड्रिग्जने सिमनला शाळेच्या नेहमीच्या अभ्यासासोबतच लढण्याचे प्रशिक्षण दिले. त्याने सिमनला जंगलात, शहरात कसे जगायचे, कठीण परिस्थितीमध्ये तग धरून जिवंत कसे राहायचे हेदेखील शिकवले.



1797 साली एका क्रांतिकारकांच्या बंडात भाग घेतल्यामुळे रॉड्रिग्जला व्हेनेझुएला सोडावे लागले. हे बंड अयशस्वी झाले. व्हेनेझुएलाची स्पेनच्या राजवटीतून सुटका करण्यासाठी असे अनेक संघर्ष तेव्हा होत असत.

काही वर्षांनंतर दोन्ही सिमनची पुन्हा भेट झाली. त्यांनी एकत्रच युरोपचा दौरा केला. बोलिव्हरचा हा दुसरा युरोप दौरा होता. वयाच्या सोळाव्या वर्षी तो पहिल्यांदा युरोपला गेला होता. तेव्हा त्याने तिथे एका स्पॅनिश उच्चाधिकाऱ्याच्या अठरा वर्षांच्या मुलीशी लग्न केले. आपल्या पत्नीला घेऊन तो व्हेनेझुएलात परतला. पण दहाच महिन्यात तिचा पीतज्वराने मृत्यू झाला.

या दुसऱ्या युरोप दौऱ्याने मात्र सिमन बोलिव्हरचे आयुष्यच बदलून टाकले. तो तेव्हा फ्रान्समधील पॅरिस शहरात होता. तिथे नेपोलियन बोनापार्टच्या शिरावर सम्राटपदाचा मुकुट ठेवण्याचा सोहळा सुरू होता. हजारो-लाखो लोक यावेळी सम्राटाचा जयजयकार करत होते. ते पाहून सिमन मनाशी म्हणाला, "लोकांकडून यापेक्षा अधिक प्रेम कुणाला मिळणार नाही. हा सोहळा पाहून माझ्या मातृभूमीच्या दु:खद स्थितीची आठवण होते. नेपोलियनसारखं जो कोणी व्हेनेझुएलाला स्वतंत्र करेल, त्याला लोकांची अशीच वाहवा आणि प्रेम मिळेल."

नंतर बोलिव्हर आणि रॉड्रीग्ज रोम येथे गेले. तिथे एका टेकडीवर गुडघे टेकून सिमन बोलिव्हरने प्रतिज्ञा केली,

“माझ्या मातृभूमीला स्पेनच्या गुलामगिरीतून मुक्त केल्याशिवाय मी स्वस्थ बसणार नाही.”

बोलिव्हरने आपले उर्वरित आयुष्य ही प्रतिज्ञा पूर्ण करण्यातच घालवले.



बरीच वर्षे संघर्ष आणि दोन क्रांतिकारी बंड केल्यावर सिमन बोलिव्हर आपले स्वप्न साकारू शकला.



पहिले बंड 1819 साली सुरू झाले. बोलिव्हरने जनरल फ्रांसिस्को डी मिरांडा याच्या नेतृत्वाखाली झालेल्या युद्धात भाग घेतला. या युद्धात बंडखोर क्रांतिकारकांची हार झाली. दुसऱ्या अपयशी बंडाचे नेतृत्व खुद्द बोलिव्हरने केले. हे युद्ध तो जिंकताजिंकता हरला. शेवटच्या क्षणी स्पेनच्या बाजूने लढणाऱ्या ओरिनोकोच्या खोऱ्यातील स्थानिक सैनिकांनी त्यांना हरवले.



पंधरा वर्षांनंतर बोलिव्हर एकवीसशे सैनिकांच्या फौजेचा प्रमुख बनला. त्याने न्यू ग्रॅनडा (सध्याचे कोलंबिया आणि पनामा) कडून व्हेनेझुएलावर आक्रमण केले. त्याच्यामागे दोन अयशस्वी बंडांचा अनुभव होता. त्याच्यासमोर सात हजार स्पॅनिश सैनिकांची फौज होती. पण शेवटी बोलिव्हर जिंकला.



दुसरी क्रांती अपयशी ठरल्यानंतर बोलिव्हरला आपली स्वतःची फौज तयार करण्याकरिता पाच वर्षे लागली. यावेळी त्याने न्यू ग्रॅनडाचे जनरल फ्रांसिस्को डी पॉला सॅनटॅनडर यांच्याशी हातमिळवणी केली. काही ब्रिटीश आणि आयरिश सैनिकांच्या मदतीने न्यू ग्रॅनडा आणि व्हेनेझुएला या आपल्या मातृभूमींना स्वतंत्र करण्याचा त्यांनी पण केला.

पावसाळा सुरू झाला. मुसळधार पावसातच बोलिव्हरच्या फौजेने आगेकूच केली. न्यू ग्रॅनडामध्ये शिरकाव करण्यासाठी तीन मार्ग होते. बोलिव्हरने सर्वात कष्टप्रद मार्ग निवडला. कारण आपण या अवघड मार्गाने येऊ अशी कल्पना शत्रुपक्ष करणार नाही, याची त्याला खात्री होती. यामुळे शत्रू गाफील राहाणार होता. जसजशी फौज पुढेपुढे चालू लागली, तसतसे बोलिव्हर सतत फौजेच्या आगेमागे जाऊन सैनिकांना प्रोत्साहीत करू लागला. नदीच्या पुराच्या पाण्यातून वाट काढताना त्याने आजारी आणि दुबळ्या सैनिकांना स्वतःच्या घोड्यावर बसवले.



कॅसानेर प्रांतात बोलिव्हरच्या फौजेला आठवडाभर कमरेइतक्या पाण्यातून चालावे लागले. पाण्याने ओल्या होऊ नयेत, म्हणून आपल्या बंदुका उचलून ते डोक्यावर धरत. रात्री एखादा जमिनीचा तुकडा दिसला की ते तिथे थांबत. पाण्यापेक्षा चिखलाच्या जमिनीवर झोपणे त्यांना जास्त बरे वाटे.



त्या भागात चालण्यासाठी वाटच नव्हती. गर्द जंगलातील झाडे कापून काढत ते चालत राहिले. तेथील नद्यांवर पूल नव्हते. गायीच्या कातड्याच्या नावा बनवून त्यांनी नद्या पार केल्या.

दुर्गम मैदानी प्रदेश पार केल्यावर बोलिव्हरच्या फौजेसमोर अँडीझ पर्वतरांगा पार करण्याचे कठीण आव्हान होते.

या दुर्गम पर्वतांमधून चालताना बोलिव्हरचे अनेक सैनिक मरण पावले. पर्वतांतील डोंगर चढून-उतरून कित्येक घोडे लंगडे झाले. सैनिकांचे आपल्या घोड्यांवर जीवापाड प्रेम होते. त्यामुळे कित्येक सैनिक आपल्या घोड्यांना घेऊन उलटपावली निघून गेले. थंडी आणि वादळी वाऱ्यांचा मारा सहन न होऊन अनेक सैनिकांचा जीव गेला.

या प्रतिकूल परिस्थितीतही बोलिव्हर पुढे पुढे जात राहिला. पर्वत ओलांडून त्याने आपल्या फौजेसह अखेर न्यू ग्रॅनडामध्ये शिरकाव केला.



बोलिव्हर न्यू ग्रॅनडात पोहोचला तेव्हा त्याच्या फौजेत केवळ शंभरएक सैनिक उरले होते. पण स्पॅनिश फौजेला चकवण्याची त्याची योजना मात्र यशस्वी झाली. अचानक झालेल्या आक्रमणाने स्पॅनिश फौज पुरती भांबावली. त्यामुळे बोलिव्हरच्या फौजेला हे युद्ध जिंकणे शक्य झाले.



तीन दिवसांनंतर बोलिव्हरची फौज बोगोटाला पोहोचली. डिसेंबर महिन्यात सिमन बोलिव्हर रिपब्लिक ऑफ कोलंबियाचा अध्यक्ष बनला. हे नवे रिपब्लिक न्यू ग्रॅनडा, व्हेनेझुएला आणि क्वितो (नंतर इक्वेडोर) या तीन देशांचे मिळून बनले होते. आता फक्त व्हेनेझुएला आणि क्वितो या देशांना मुक्त करायचे होते.

जून 1821 मध्ये बोलिव्हरने व्हेनेझुएलातील कॅरोबोबो प्रांतात झालेल्या युद्धात स्पॅनिश फौजेचा पराभव केला आणि व्हेनेझुएला देशही स्वतंत्र केला. तिथे जनरल सॅनटॅंडरला प्रमुखपदी नियुक्त करून तो इक्वेडोरला मुक्त करण्याच्या मोहिमेवर निघाला.

इक्वेडोरमध्ये बोलिव्हरला मॅन्युएला सेंझ ही त्याच्या भावी आयुष्याची जोडीदारीण मिळाली.

1824 साली बोलिव्हरने आपल्या फौजेचा प्रमुख अंतानियो होस सुक्रे याच्या मदतीने पेरू देशाला मुक्त केले. काही दिवसांनी सुक्रे याने उत्तर पेरू प्रांतालाही मुक्त केले. बोलिव्हरच्या सन्मानार्थ या नव्या देशाने आपले नाव बोलिव्हिया असे ठेवले.

बोलिव्हर आता पेरू, बोलिव्हिया, रिपब्लिक ऑफ कोलंबिया (न्यू ग्रॅनडा, व्हेनेझुएला आणि इक्वेडोर) यांचा अध्यक्ष बनला. तो हिस्पॅनिक (स्पॅनिश बोलणाऱ्या) अमेरिकन देशांचा एक गट बनवू पाहात होता. 1826 साली पनामा देशात एक परिषद भरली. यामध्ये बोलिव्हरच्या देशांबरोबरच मध्य अमेरिका आणि मेक्सिको या देशांचेही प्रतिनिधी सहभागी झाले. परिषद पूर्णतः यशस्वी झाली नसली तरी इथूनच आंतरराष्ट्रीय परस्पर सहकार्याची सुरुवात झाली.

1826 साली सिमन बोलिव्हरच्या रिपब्लिक ऑफ कोलंबियामध्ये अंतर्गत कलह सुरू झाला. व्हेनेझुएला आणि न्यू ग्रॅनडा हे देश एकमेकांसोबत राहू इच्छित नव्हते. यातून मग गृहयुद्ध झाले. रिपब्लिक ऑफ कोलंबिया एकसंघ ठेवण्यासाठी बोलिव्हरने पेरू देश सोडला. पण त्याला या कामात यश मिळाले नाही. रिपब्लिक ताब्यात घेण्याच्या त्याच्या कारवाईला लोकांनी तीव्र विरोध केला. 1828 साली कोलंबियातील बोगोटा शहरात बोलिव्हरची हत्या करण्याचा प्रयत्न झाला. पण पत्नी मॅन्युएला सेंझ हिच्या चतुराईमुळे तो थोडक्यात बचावला.

भर मध्यरात्री बोलिव्हरला आपल्या महालात कुत्र्यांच्या भुंकण्याचे आवाज ऐकू आले. तलवार आणि बंदूक घेऊन तो आपल्या खोलीच्या दरवाजाकडे धावला. पण त्याची पत्नी मॅन्युएला सैंझने त्याला बाहेर जाण्यापासून रोखले.

बाहेर लोक ओरडत होते – “जुलमी राजवटीची अखेर! बोलिव्हरचा मृत्यू!” मॅन्युएलाने जमिनीपासून बऱ्यापैकी उंचावर असलेल्या एका खिडकीतून वाकून बाहेर पाहिले. मग तिने बोलिव्हरला इशारा केला. बोलिव्हरने खिडकीतून बाहेर उडी मारली आणि त्याक्षणीच त्याच्या खोलीचा दरवाजा तुटून पडला. काही मारेकरी आत शिरले. पण तेव्हाच मॅन्युएलाने तलवार उपसली आणि ती मारेकऱ्यांकडे झेपावली.

मॅन्युएलाच्या आकस्मिक हल्ल्यामुळे मारेकरी स्तब्ध झाले. मॅन्युएलाने त्यांना समजावले की बोलिव्हर महालात नसून कुठेतरी बाहेर गेला आहे.

अंततः बोलिव्हरला उमगले की ज्या देशांना त्याने स्वतंत्र केले तिथेच त्याच्या जीवाला खूप धोका आहे.

म्हणून, मे 1830 मध्ये त्याने दक्षिण अमेरिका सोडून युरोपला जाण्याचा विचार केला. पण निघण्याची तयारी करत असतानाच त्याला बोगोटामध्ये परिस्थिती खूप बिघडल्याची बातमी मिळाली. मग त्याने युरोपला जाण्याचा बेत रद्द केला. तो आपल्या एका स्पॅनिश हितचिंतकाच्या घरी राहाण्यास गेला.

तिथेच 17 डिसेंबर 1830 रोजी सिमन बोलिव्हरचा टी.बी. या आजाराने मृत्यू झाला.